**महाराष्ट्र ठेविदारांच्या (वित्तीय संस्थांमधील)**
**हितसंबंधांचे संरक्षण अधिनियम १९९९ अंतर्गत**
**सक्षम प्राधिकारी म्हणून घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः एमआयएस २०१५ / प्र.क्र. १०१५ / पोल -११**
गृह विभाग, दुसरा मजला, मंत्रालय, मुंबई ३२.
तारीख: ३ सप्टेंबर, २०१५.

<u>वाचा</u> : **महसूल व वन विभाग, शासन आदेश क्र. संकीर्ण २०१४ / १२ / प्र.क्र. २१०/ई १, दिनांक ३१.१२.२०१४.**

<u>प्रस्तावना</u> :

महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधांचे संरक्षण अधिनियम, १९९९ मधील तरतूदींच्या अंमलबजावणीसाठी महाराष्ट्रातील सर्व जिल्हयांमध्ये सक्षम प्राधिकारी नेमणेबाबत संदर्भाधीन शासन आदेश निर्गमित करण्यात आलेला आहे.

तथापि, उपरोक्त संदर्भाधीन शासन आदेश निर्गमित होण्याच्या दिनांकापूर्वी महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधाचे संरक्षण अधिनियम, १९९९ अंतर्गत प्रकरणनिहाय नियुक्त करण्यात आलेले सक्षम प्राधिकारी तसेच सक्षम प्राधिकारी नियुक्तीकरीता जिल्हाधिका-यांमार्फत शासनास सादर करण्यात आलेल्या विविध प्रस्तावांबाबत काय कार्यवाही करावी याचा संदर्भाधीन शासन आदेशाव्दारे खुलासा होत नसल्याने, आता शासन याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय**

दिनांक ३१.१२.२०१४ च्या पूर्वी महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधांचे संरक्षण अधिनियम, १९९९ अन्वये जर प्रकरण निहाय प्राधिकारी घोषित करण्याची अधिसूचना / शासन निर्णय निर्गमित झाला असेल तर अशी प्रकरणे पुर्वीच्याच सक्षम प्राधिका-याने निकालात काढणे आवश्यक आहे.

तसेच दिनांक ३१.१२.२०१५ पूर्वी महाराष्ट्र ठेवीदारांच्या (वित्तीय संस्थांमधील) हितसंबंधांचे संरक्षण अधिनियम, १९९९ अन्वये सक्षम प्राधिकारी नेमणेबाबत शासन स्तरावर प्रलंबित असलेल्या प्रकरणांबाबत संदर्भाधीन शासन आदेशाच्या अनुषंगाने सक्षम प्राधिकारी नेमणेबाबतची कार्यवाही संबंधित जिल्हाधिका-यांनी करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०५१४३६२०८३२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh Mahadeo Khade

Digitally signed by Suresh Mahadeo Khade
DN: CN = Suresh Mahadeo Khade, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Date: 2015.09.05 15:37:08 +05'30'

**( सुरेश खाडे )**
उप सचिव, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रत,

(१) सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
(२) मा. मुख्य सचिव, यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
(३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
(४) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
(५) सर्व विभागीय आयुक्त,
(६) सर्व जिल्हाधिकारी,
(७) सर्व पोलीस आयुक्त / अधिक्षक
(८) उप सचिव (ई - १) यांचे स्वीय सहाय्यक, महसूल व वन विभाग, पहिला मजला, मंत्रालय, मुंबई - ३२.
(९) अवर सचिव (ई २) / कक्ष अधिकारी, ई - ४ व ई -११, महसूल व वन विभाग, पहिला मजला, मंत्रालय, मुंबई ३२.
(१०) पोलीस उप आयुक्त, आर्थिक गुन्हे शाखा, गुन्हे अन्वेषण विभाग, मुंबई.
(११) निवडनस्ती, पोल ११.